**एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये नवीन संवर्गांचा समावेश करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-१११७/प्र.क्र.६६/सीपीटीपी**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २९ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा :**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दिनांक २०.१.२०१४.

२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन- ०५१७/ प्र.क्र.३६/सीपीटीपी, दिनांक २१.०७.२०१७.

३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन- १११७/ प्र.क्र.६६/सीपीटीपी, दिनांक ०५.१२.२०१७

**प्रस्तावनाः-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे शासनसेवेत नियुक्त होणा-या अधिकाऱ्यांमध्ये संघभावना निर्माण होऊन, त्यांच्यात मैत्रीपूर्ण व सौहर्दाचे नाते निर्माण व्हावे व त्यांची सर्वव्यापक जडणघडण व्हावी, यासाठी अखिल भारतीय सेवेतील अधिकाऱ्यांप्रमाणे राज्यसेवेतील अधिकाऱ्यांसाठी दोन वर्ष कालावधीचा एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षणाचा कार्यक्रम सुरु करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय शासनाने उपरोक्त वाचा येथील क्र.१ च्या शासन निर्णयान्वये घेतला आहे. त्यानुसार सन २०१४ पासून गट अ मधील ९ आणि गट ब मधील १० संवर्गातील उमेदवारांसाठी अनुक्रमे यशदा, पुणे आणि वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थांमार्फत एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येत आहे.

२. एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी) सन २०१४ पासून सुरु असून सुरुवातीस या प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये राज्यसेवा परीक्षेद्वारे नियुक्ती होणारे गट अ पदांचे ९ संवर्ग व गट ब पदांचे १० संवर्ग मिळून एकूण १९ संवर्गांच्या पदांचा समावेश होता. राज्यसेवा परीक्षेत नवीन संवर्गांचा समावेशाच्या दृष्टीने महाराष्ट्र लोकसेवा आयोग व या विभागाकडून करण्यात आलेल्या पाठपुराव्यामुळे तसेच संबंधित प्रशासकीय विभागांनी अनुकूलता दर्शविल्यामुळे या १९ संवर्गामध्ये वाढ होऊन आता राज्यसेवा परीक्षेमध्ये गट-अ मधील ११ व गट-ब मधील १३ अशी एकूण २४ संवर्गांची पदे सरळसेवेने भरण्यात येत आहेत. नव्याने समाविष्ट झालेले गट अ चे २ संवर्ग आणि गट ब चे ३ संवर्ग यांच्या राज्यसेवा परीक्षेमधील समावेशाबाबत दिनांक ५ डिसेंबर, २०१७ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. त्याचप्रमाणे आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील गट अ चे २ संवर्ग व गट ब चा १ संवर्ग व उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील गट अ चा १ संवर्ग यांचा समावेश राज्य सेवा परीक्षेमध्ये व पर्यायाने एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये करण्याबाबत या विभागांनी सहमती दिली असून या अनुषंगाने सेवाप्रवेश नियम अधिसूचित करणे व इतर आवश्यक विहित कार्यवाही पूर्ण केली आहे. या संवर्गांचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| | |
|---|---|
| १) उद्योग,उर्जा व कामगार विभाग- | १) उद्योग उपसंचालक (तांत्रिक ), गट अ |
| २) आदिवासी विकास विभाग- | १) उपसंचालक /प्रकल्प अधिकारी (एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प ) (श्रेणी -१ )/ उपायुक्त, गट अ<br>२) प्रकल्प अधिकारी (एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प )(श्रेणी -२) / सहायक आयुक्त, गट अ<br>३) सहायक प्रकल्प अधिकारी / सांख्यिकी अधिकारी / प्रशासकीय अधिकारी /संशोधन अधिकारी / गृहप्रमुख / प्रबंधक , गट ब |

३ . एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत देण्यात येणारे सर्वंकष प्रशिक्षण व तज्ज्ञ व्याख्याते व अधिकारी यांचे मार्गदर्शन राज्य शासनाच्या सेवेतील इतर संवर्गातील उमेदवारांना प्राप्त व्हावे या उद्देशाने प्रशासकीय स्वरुपाचे कामकाज असणा-या परंतु राज्यसेवा परीक्षेमध्ये समावेश नसणा-या उद्योग, उर्जा व कामगार विभाग तसेच आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त असणाऱ्या उपरोक्त परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या एकूण ४ संवर्गांचा समावेश राज्य सेवा परीक्षा व पर्यायाने एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णयः-</u>**

राज्यसेवा परीक्षेमध्ये अंतर्भूत व पर्यायाने एकत्रित परीवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमामधे समावेश असलेल्या २४ संवर्गामध्ये उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या अधिनस्त १) उद्योग उपसंचालक (तांत्रिक ), गट अ तसेच आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त २) उपसंचालक / प्रकल्प अधिकारी (एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प) (श्रेणी -१ )/ उपायुक्त, गट अ , ३) प्रकल्प अधिकारी (एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प )(श्रेणी -२) / सहायक आयुक्त, गट अ, ४) सहायक प्रकल्प अधिकारी / सांख्यिकी अधिकारी /प्रशासकीय अधिकारी /संशोधन अधिकारी /गृहप्रमुख / प्रबंधक , गट ब या ४ संवर्गांचा समावेश करण्यास शासन मान्यता देत आहे. सबब, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या राज्यसेवा परीक्षेच्या अंतिम निकालाच्या आधारे शिफारसपात्र ठरणा-या विवरणपत्र-अ येथील सर्व संवर्गातील उमेदवारांना एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण देण्यात येईल. तसेच या उमेदवारांना उपरोक्त वाचा क्र. २ येथील शासन निर्णयामधील तरतूदींना अनुसरून एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत राबविण्यात येणारा मुंबई विद्यापीठाशी संलग्न पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम यशस्वीरित्या पूर्ण करावा लागेल. एकत्रित परिवीक्षाधीन कार्यक्रमासाठी यापूर्वी वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले व पुढील काळात निर्गमित करण्यात येणारे शासन निर्णय, परिपत्रके, अधिसूचना इ. मधील तरतूदी विवरणपत्र-अ मधील सर्व संवर्गांना लागू राहतील.

२.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८११२९१२०५००८५०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
Date: 2018.11.29 17:30:04 +05'30'

**( वि. रा. ठाकूर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,
२. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२,
३. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (महसूल/ गृह/ ग्राम विकास/ वित्त/ सहकार/ नगर विकास/ राज्य उत्पादन शुल्क/ परिवहन/ सामान्य प्रशासन/ शालेय शिक्षण/कौशल्य विकास व उद्योगकता/ उद्योग ऊर्जा व कामगार/आदिवासी विकास).
४. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
६. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन संस्था (वनामती), नागपूर,
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (**पत्राद्वारे),
८. निवडनस्ती कार्यासन - सीपीटीपी.

**सामान्य प्रशासन विभाग / सीपीटीपी**

## "विवरण पत्र-अ "

| अ.क्र | प्रशासकीय विभाग | गट- अ | गट-ब |
|---|---|---|---|
| १ | महसूल व वन विभाग | १) उपजिल्हाधिकारी<br>२) तहसिलदार | १)नायब तहसिलदार<br>२)उप अधीक्षक भूमी अभिलेख |
| २ | गृह विभाग | ३) पोलीस उपअधीक्षक / सहायक पोलीस आयुक्त,<br>४) अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क | ३)सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी<br>४)उप अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क<br>५) सहायक आयुक्त राज्य उत्पादन शुल्क |
| ३ | वित्त विभाग | ५) सहायक विक्रिकर आयुक्त<br>६) सहायक संचालक, महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा | ६) लेखाधिकारी, महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा |
| ४ | सहकार विभाग | ७) उपनिबंधक, सहकारी संस्था गट | ७)सहायक निबंधक, सहकारी संस्था |
| ५ | ग्राम विकास विभाग | ८) उप मुख्य कार्यकारी अधिकारी/ गट विकास अधिकारी (उच्चश्रेणी) | ८)सहायक गट विकास अधिकारी |
| ६ | नगर विकास विभाग | ९) मुख्याधिकारी नगरपालिका/ परिषद (अ) | ९) मुख्याधिकारी नगरपालिका/ परिषद (ब) |
| ७ | सामान्य प्रशासन विभाग | - | १०)कक्ष अधिकारी |
| ८ | शालेय शिक्षण व क्रिडा विभाग | १०) शिक्षणाधिकारी | ११)उपशिक्षणाधिकारी |
| ९ | कौशल्य विकास विभाग | ११) सहायक संचालक ,कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, गट-अ | १२) कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन अधिकारी, |
| १० | उद्योग , उर्जा व कामगार विभाग | १२) उद्योग उपसंचालक (तांत्रिक ), गट अ | १३)उद्योग अधिकारी (तां.), गट-ब |
| ११ | आदिवासी विकास विभाग | १३) उपसंचालक /प्रकल्प अधिकारी (एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प ) (श्रेणी -१)/उपायुक्त, गट अ | १४) ) सहायक प्रकल्प अधिकारी / सांख्यिकी अधिकारी / प्रशासकीय अधिकारी /संशोधन अधिकारी / गृहप्रमुख / प्रबंधक , गट ब |
| | | १४) प्रकल्प अधिकारी (एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प ) (श्रेणी -२) / सहायक आयुक्त, गट अ | -- |
| | | १४ | १४ |
| | **एकूण** | २८ | |